नवनिर्मित उप विभागीय अधिकारी, बल्लारपूर, जिल्हा चंद्रपूर या कार्यालयाकरीता नवीन पदांची निर्मिती करण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१४/प्र. क्र. १७४/ई-८,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

तारीख: १६ मे, २०१५

**वाचा:-**

१) मंत्रिमंडळाच्या दि.२८/०८/२०१४ च्या बैठकीचे कार्यवृत्त.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. प्राफेब-२०१०/प्र. क्र.२६/पुर्नबांधणी-३/म-१०, दिनांक ३०/०७/२०१३.

३) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्र. प्राफेब-२०१३/व्हीआयपी-२६०/प्र. क्र.२३८/म-१०, दिनांक १८/११/२०१४.

४) वित्त विभागाचे पृष्ठांकन क्र. पदनि-२०१५/प्र.क्र.८८/१५/विसु-१, दिनांक ०२/०३/२०१५.

५) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०१३/४८७/प्र. क्र.२७/अ-३, दि.०८/०५/२०१५.

**प्रस्तावना:-**

राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक २८/०८/२०१४ रोजीच्या बैठकीत चंद्रपूर जिल्ह्यातील अस्तित्वातील चंद्रपूर उप विभागाचे विभाजन करुन चंद्रपूर व बल्लारपूर असे दोन उपविभाग निर्माण करण्याबाबत व त्या अनुषंगाने नवनिर्मित उपविभागीय अधिकारी, बल्लारपूर यांच्या कार्यालयीन कर्मचारी पदांच्या निर्मितीबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.-

१) नागपूर महसूल विभागातील भूसंपादन अधिका-याचे १ पथक निरस्त करुन सदर पथकातील भूसंपादन अधिकारी-१ पद, अव्वल कारकून-१ पद, लिपिक टंकलेखक-२ पदे, शिपाई-२ पदे अशी एकूण ६ पदे नवीन उपविभागीय कार्यालय, बल्लारपूर, जि. चंद्रपूर करीता समायोजित करण्यास आणि सदर पदांपैकी भूसंपादन अधिकारी हे पद उपविभागीय अधिकारी या पदाकरीता समायोजित करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२) नवीन उपविभागीय कार्यालय, बल्लारपूर, जि. चंद्रपूर करीता आवश्यक असणारे नायब तहसिलदार-१ पद, अव्वल कारकून-१ पद, लघुलेखक ( नि. श्रे. )-१ पद आणि वाहनचालक-१ पद अशी एकूण नवीन ४ पदे उच्चाधिकार समितीची पुर्वमान्यता घेवून निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. त्यानुषंगाने शासन अधिसूचना, क्रमांक: प्राफेब-२०१३/व्हीआयपी-२६०/प्र.क्र.२३८/म-१०, दिनांक १८/११/२०१४ अन्वये चंद्रपूर जिल्ह्यात बल्लारपूर तालुक्यासाठी बल्लारपूर उप विभाग निर्माण करण्याचे व त्याचे मुख्यालय बल्लारपूर येथे स्थापित करण्याचे अधिसूचित करण्यात आले आहे. परिणामी, बल्लारपूर उप विभागीय कार्यालयासाठी पदनिर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०१३/४८७/प्र. क्र.२७/अ-३, दिनांक ०८/०५/२०१५ अन्वये नागपूर महसूल विभागातील भंडारा जिल्ह्यातील उप जिल्हाधिकारी ( भुसंपादन ) (लसिका) भंडारा हे एक पथक निरस्त/समर्पित करण्यात आले आहे. तसेच मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २८/०१/२०१५ रोजी झालेल्या ९२ व्या बैठकीत नवनिर्मित उप विभागीय कार्यालय, बल्लारपूरकरीता ४ पदांच्या निर्मितीस मान्यता देण्यात आली आहे.

## शासन निर्णय

प्रस्तावनेत नमूद केलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने नवनिर्मित उप विभागीय अधिकारी, बल्लारपूर, जि.चंद्रपूर यांचे कार्यालयाकरीता खालील प्रमाणे अधिकारी/कर्मचारी पदे निर्मितीस शासन मान्यता देत आहे.-

| अ. क्र. | संवर्गनिहाय पदे | वेतन श्रेणी (रुपये) | पदांची संख्या | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | उपविभागीय अधिकारी | १५,६००-३९,१०० (ग्रेड पे ५४००) | १ | उप जिल्हाधिकारी (भुसंपादन) (लसिका) भंडारा यांचे १ पथक निरसित/समर्पित करुन उपविभागीय अधिकारी, बल्लारपूर यांच्या कार्यालयाकडे वर्ग करण्यात आलेली पदे |
| २ | अव्वल कारकून | ५,२००-२०,२०० (ग्रेड पे ३५००) | १ | |
| ३ | लिपिक टंकलेखक | ५,२००-२०,२०० (ग्रेड पे १९००) | २ | |
| ४ | शिपाई | ४,४४०-७,४४० (ग्रेड पे १३००) | २ | |
| ५ | नायब तहसिलदार | ९,३००-३४,८०० (ग्रेड पे ४३००) | १ | उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने नव्याने निर्माण केलेली पदे |
| ६ | लघुलेखक (नि. श्रे.) | ९,३००-३४,८०० (ग्रेड पे ४३००) | १ | |
| ७ | अव्वल कारकून | ५,२००-२०,२०० (ग्रेड पे ३५००) | १ | |
| ८ | वाहन चालक | ५,२००-२०,२०० (ग्रेड पे १९००) | १ | |
| | | **एकूण** | **१०** | |

२. सदर पदे शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. प्राफेब-२०१०/प्र. क्र.२६/पुर्नबांधणी-३/म-१०, दिनांक ३०/०७/२०१३ अनुसार महसूल व वन विभागाच्या आकृतीबंध संवर्गातील आहेत. या पदावरील पदधारकांना शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील. उपरोक्त पदे अस्थायी स्वरुपात दि. २९/०२/२०१६ पर्यंत चालू राहतील.

३. सदर पदावर होणारा खर्च "मागणी क्रमांक सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन, (००) (०९४ ) इतर आस्थापना (०१) उप विभागीय आस्थापना (०१) (०५) आयुक्त नागपूर (२०५३ ०२०६), ०१- वेतन" या लेखाशिर्षाखाली चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, राज्य मंत्रिमंडळाच्या दि. २८/०८/२०१४ च्या बैठकीतील निर्णय आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०२/विसु-१, दिनांक २/१२/२०१४ व पृष्ठांकन क्र. पदनि-२०१५/प्र.क्र. ८८/१५/विसु-१, दि.०२/०३/२०१५ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०५१४१२१२०४२५१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrakant Nivrutti Padale
Date: 2015.05.16 17:30:43 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. सचिव ( वने ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
३. जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
४. उप विभागीय अधिकारी, बल्लारपूर, जि. चंद्रपूर.
५. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र २, नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र २, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
८. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९/वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव, कार्यासन अ-३/ब-१/म-१०/ई-२/ई-७/ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.